कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोव्हिड-१९ विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांना सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.

मयत श्रीमती हर्षदा हरिश्चंद्र वाडीकर, अधिपरिचारीका

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०२२/प्र.क्र.८४२/सेवा-५**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,

मंत्रालय, मुंबई ४०० ००१.

दिनांक : १४ जुलै,२०२३

वाचा :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२०.

२) संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/कोवीड-१९/कक्ष ५८/कोविड-१९/विमा कवच प्रस्ताव/१४८५३-५८/२२, दि.१२.०९.२०२२

**शासन निर्णय:-**

संदर्भांकित क्रमांक १ येथील वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २९ मे, २०२० अन्वये कोविड-१९ संबंधित कर्तव्य बजावतांना कोविड-१९ विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू होणाऱ्या कर्मचाऱ्यांना विमा कवच/ सानुग्रह सहाय्य लागू करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे.

२. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांनी मयत श्रीमती हर्षदा हरिश्चंद्र वाडीकर, अधिपरिचारीका, उपजिल्हा रुग्णालय, सावंतवाडी, जि.सिंधुदूर्ग यांच्या कुटुंबियांना वित्त विभाग शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० अनुसार रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या सानुग्रह सहाय्य मंजूरीचा प्रस्ताव सादर केला आहे.

३. उपजिल्हा रुग्णालय, सावंतवाडी, जि.सिंधुदूर्ग येथे कार्यरत असलेल्या मयत श्रीमती हर्षदा हरिश्चंद्र वाडीकर, अधिपरिचारीका यांचा कोविड-१९ संबंधित कर्तव्य पार पाडताना कोरोना विषाणू संसर्गाने दि.१९.१०.२०२० रोजी मृत्यू झाला आहे. मयत श्रीमती वाडीकर यांच्या सेवा कोविड-१९ विषाणूच्या सार्वत्रिक साथीच्या अनुषंगाने मदतकार्य यामध्ये समाविष्ट होत आहेत. मयत श्रीमती वाडीकर ह्या रुग्णालयात दाखल होण्यापूर्वी १४ दिवस कर्तव्यावर हजर होत्या. मयत श्रीमती वाडीकर यांचा मृत्यू कोविड-१९ मुळे झाला असल्याचे वैद्यकीय अधिक्षक,उपजिल्हा रुग्णालय, सावंतवाडी, जि.सिंधुदूर्ग यांनी प्रमाणित केले आहे.

४. त्यानुसार, उपजिल्हा रुग्णालय, सावंतवाडी, जि.सिंधुदूर्ग येथे कार्यरत मयत श्रीमती हर्षदा हरिश्चंद्र वाडीकर, अधिपरिचारीका यांच्या कुटुंबियांना रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेचे सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास या आदेशाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

५.  वित्त विभाग शासन निर्णय, क्र. संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० मधील तरतूदीनुसार मयत श्रीमती हर्षदा हरिश्चंद्र वाडीकर या कर्मचाऱ्यांच्या वारसास या संदर्भातील तरतूदी व नियम विचारात घेऊन सानुग्रह सहाय्य अदा करण्याची जबाबदारी संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, पुणे यांची राहील.

६.  प्रस्तुत खर्च खाली नमूद लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यईल.

प्रधान शिर्ष:-२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

उप शिर्ष:- ०३-ग्रामीण आरोग्य सेवा

११०-५ इतर रुग्णालये व दवाखाने

(०१)(०१) कुटीर रुग्णालय

मागणी क्र. :- आर-१ (२२१००३१५)

बाब:- **०१ वेतन**

७.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून,त्याचा संकेतांक २०२३०७०७१४४०५५४९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

ARCHANA VILAS WALZADE

Digitally signed by ARCHANA VILAS WALZADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b17094004b015083dae757656e5d24847898197ddd6b0366a9177f097ed0887a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B4E19876AB3EEC36E3A3B988441648AB87470CDFE66B14CFBE7AC9BD770485C1, cn=ARCHANA VILAS WALZADE
Date: 2023.07.14 17:47:26 +05'30'

(अर्चना वालझाडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय,पुणे
२) सहसंचालक आरोगय सेवा (हिहजजरोग) पुणे-१
३) उपसंचालक आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर
४) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
५) जिल्हा शल्यचिकीत्सक, जिल्हा रुग्णालय, सिंधुदुर्ग
६) वैद्यकीय अधिक्षक,उपजिल्हा रुग्णालय,सावंतवाडी जि. सिंधुदुर्ग
७) श्री.अभिजीत हरिश्चंद्र वाडीकर, रा. ई.३५९ मातोश्री भवन खासखिलवाडा, सावंतवाडी जि.सिंधुदुर्ग
८) निवडनस्ती (सेवा-५)